**सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना सहाय्यक अनुदान (अनिवार्य) वितरीत करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मराग्रं-२०२१/प्र.क्र.६०/साशि-५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ मार्च, २०२२.

वाचा : १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.२४.०६.२०२१
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, समक्रमांक, दि.२२.०७.२०२१,दि.२०.०८.२०२१ व दि.१७.११.२०२१
३) ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.३२/२०२१-२२/११९०८,दि.१४.०२.२०२२ व क्र.३२/२०२१-२२/१३००३,दि.०९.०३.२०२२
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.१७.०३.२०२२

**प्रस्तावना :**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना सहाय्यक अनुदानासाठी मागणी क्र. डब्ल्यू-४, २२०५, कला व संस्कृती,१०५, सार्वजनिक ग्रंथालये, (०३)(०१) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य (अनिवार्य) (२२०५ ०२९८) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षांतर्गत रु.१२२,५१,२५,०००/-(रुपये एकशे बावीस कोटी एक्कावण लाख पंचवीस हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला होता. सदर लेखाशिर्षामध्ये सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पिय सुधारीत अंदाजामध्ये रु. ११२,५६,५५,०००/-(रुपये एकशे बारा कोटी छेप्पन लाख पंचावन्न हजार फक्त) इतका निधी मंजूर करण्यात आला आहे.

शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना सहाय्यक अनुदानासाठी सदर अर्थसंकल्पीत निधीतून शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांचे सन २०२०-२१ मध्ये थकित अनुदान व सन २०२१-२२ मधील अनुदानाचा पहिला हप्ता अदा करण्यासाठी संदर्भाधिन दि.२२.०७.२०२१, दि.२०.०८.२०२१ व दि. १७.११.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.१०१,१०,०९,०००/- (अक्षरी रुपये एकशे एक कोटी दहा लाख नऊ हजार फ़क्त) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आता ग्रंथालय संचालनालयाकडून प्राप्त संदर्भाधिन दि.१४.०२.२०२२ रोजीच्या पत्रास अनुसरुन शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना सन २०२१-२२ मधील परिरक्षण अनुदानाचा दुसरा/अंतीम-एकत्रीत हप्ता अदा करण्यासाठी (अर्थसंकल्पिय सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत) रु.११,४६,४६,०००/- (रुपये अकरा कोटी सेहचाळीस लाख सेहचाळीस हजार फ़क्त) इतका निधी वितरीत करुन खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना सन २०२१-२२ मधील परिरक्षण अनुदानाचा दुसरा/अंतीम-एकत्रीत हप्ता अदा करण्यासाठी रु.११,४६,४६,०००/- ( रुपये अकरा कोटी सेहचाळीस लाख सेहचाळीस हजार फ़क्त) इतका निधी वितरीत करुन खर्च करण्यास ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना शासन मान्यता देण्यात येत आहे. यानुषंगाने संबंधित जिल्हा ग्रंथालय अधिकारी

/ कार्यालय प्रमुखांना "आहंरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच त्यांना ३१- सहायक अनुदाने ( वेतनेतर ) या उद्दिष्टाखालील देयकावर "नियंत्रक अधिकारी" म्हणून प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार देखील प्रदान करण्यात येत आहेत.

**२.** तसेच ग्रंथालय संचालकांच्या संदर्भाधिन दि.०९.०३.२०२२ रोजीच्या पत्रास अनुसरुन शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या पहिला हप्ता अदा करण्यासाठी संदर्भाधिन दि.१७.११.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीपैकी शिल्लक राहीलेला रु. ५,८५,३२,०३७/- (अक्षरी रुपये पाच कोटी पंच्याऐंशी लाख बत्तीस हजार सदोतीस फ़क्त) इतका निधी ग्रंथालयांच्या अनुदानाचा दुसरा/ अंतीम-एकत्रित हप्ता अदा करण्यासाठी आहरीत करुन खर्च करण्यास ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना मान्यता देण्यात येत आहे.

**३.** उपरोक्त निधीतून शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांचा सन २०२१-२२ मधील परिरक्षण अनुदानाचा दुसरा/अंतीम-एकत्रीत हप्ता अदा करण्यात यावा.

**४.** सदर खर्च मागणी क्र. डब्ल्यू-४, २२०५, कला व संस्कृती,१०५, सार्वजनिक ग्रंथालये, (०३)(०१) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य (अनिवार्य) (२२०५ ०२९८) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ मध्ये अर्थसंकल्पीत तरतूदीपैकी वितरीत केलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

**५.** अनुदानाच्या रक्कमेची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधित कार्यालय प्रमुखांनी विहित मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

**६.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ मधील अटींची पुर्तता करण्यात आली असून सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २१९/२०२२/ व्यय-५, दि.२३.०२.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०३२३११४८४२५४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIL VITHALRAO SAWARE

Digitally signed by ANIL VITHALRAO SAWARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72cb8a88eb62e9fce4658097f358551a97efd88300730957d6401f7779015bcf, pseudonym=06CCFF3ECB0B3FFBAB55D9A0981C8214C023AFF2, serialNumber=1C7875BFBCCDB94828A5028954F06ED28EC75FD43053DB3AE8254FA5A5D14A57, cn=ANIL VITHALRAO SAWARE
Date: 2022.03.23 11:50:20 +05'30'

**( अनिल वि. सावरे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा. राज्यमंत्री,उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
५. मा. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई
६. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
७. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
८. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई

९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०. निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई
११. सर्व सहायक ग्रंथालय संचालक/जिल्हा ग्रंथालय अधिकारी/ग्रंथपाल
(ग्रंथालय संचालनालयामार्फ़त )
१२. अवर सचिव ( व्यय-५ ), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१३. कक्ष अधिकारी (साशि १), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई
१४. निवडनस्ती (साशि-५), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.